पंचायत समिती, नरखेड (जि. नागपूर) येथील प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत......

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०२१/प्र.क्र.०१/बांध-४

५ वा मजला, मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१

तारीख : २९ एप्रिल, २०२५

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.पंसई-२०१०/प्र.क्र.-४२/पंरा-०७, दिनांक ०६ मार्च, २०१०.

२) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.पंसई-२०१३/प्र.क्र.१८४/पंरा-७, दिनांक २२ जुलै, २०१४.

३) **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर यांचे पत्र क्रमांकः** जिपना/बांध/का.२(१)/५५०६/२०२०, दिनांक ०२ सप्टेंबर, २०२०

४) **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर यांचे पत्र क्रमांकः** जिपना/बांध/का.२(१)/१२६७/२०२१, दिनांक २६ फेब्रुवारी, २०२१

**प्रस्तावना :-**

अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर यांनी वाचा मधील अनुक्रमांक ३ ते ४ येथील पत्रांन्वये पंचायत समिती, नरखेड (जि. नागपूर) येथील नवीन प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याच्या बांधकामांस प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

०२. उक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक ०६ मार्च, २०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये, पंचायत समिती नरखेड (जि.नागपूर) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.१७२.२७ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता व अनुक्रमांक २ येथील दिनांक २२ जुलै, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पंचायत समिती नरखेड (जि. नागपूर) प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास रू.१९८.०० लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. पंचायत समिती नरखेड (जि. नागपूर) येथील प्रशासकीय इमारतीचे तळ मजल्याचे बांधकाम सन २०१४ ला पुर्ण झाले आहे. सदर पंचायत समितीची अस्तित्वातील इमारत ही तळ मजल्याचे एकुण क्षेत्रफळ १०२६.६० चौ. मी. आहे. प्रस्तावित विस्तारीकरण हे पहिल्या मजल्यावर नियोजीत आहे. सद्यस्थितीत गट विकास अधिकारी, पंचायत समिती, नरखेड यांनी सादर केलेल्या सुधारीत आकृती बंधानुसार सदर इमारत प्रशासकीय

कामकाजास अपुरी पडत आहे. प्रत्येक विभागात कर्मचारी निहाय टेबल, खुर्ची व अभ्यागतांना बसण्यासाठी व्यवस्था नसल्यामुळे, नरखेड पंचायत समिती (जि.नागपूर) प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याचे ८०६.४२ चौ.मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केलेले आहे. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर यांनी नरखेड पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या तळ मजल्याचे बांधकाम करताना मान्यता घेण्यात आलेल्या मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई यांच्याकडील जॉब नंबर - T-ADM/५५११ DRG NO. २२ या नमुना आराखड्यावर आधारित अंदाजपत्रक सादर केले आहे. नरखेड पंचायत समिती (जि. नागपूर) प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याचे बांधकामांचे सन २०२२ - २३ च्या दरसूचीवर आधारित रू.३३३.७६ लक्ष किंमतीचे अंदाजत्रक कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, नागपूर यांनी साक्षांकित केलेले आहे. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर यांनी प्रस्तावासोबत लीड चार्ट, क्वॅरी चार्ट, पंचायत समितीच्या ठरावाची प्रत इत्यादी कागदपत्रे सादर केलेली आहेत.

**०३.** अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती, पंचायत समिती, नरखेड (जि. नागपूर) येथील नविन प्रशासकीय इमारतीकरिता पहिल्या मजल्याच्या बांधकामासाठी रु.३३३.७६ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पंचायत समिती, नरखेड (जि. नागपूर) येथील नविन प्रशासकीय इमारतीकरिता पहिल्या मजल्याच्या बांधकामासाठी रुपये ३,३३,७६,०००/- (रुपये तिन कोटी तेहतीस लाख शहात्तर हजार मात्र) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) प्रस्तुत बांधकामास तांत्रिक मान्यता देण्यापुर्वी संकल्पन तपासून घेणे आवश्यक राहील.
२) प्रस्तुत इमारतीचे बांधकाम उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा. बां. प्रादेशिक विभाग, नागपूर यांच्याकडील विहित नमुना आराखड्यानुसार हाती घेण्यापूर्वी, स्थानिक नगररचना प्राधिकरणाची तसचे अग्निशमन यंत्रणेची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.
३) नियोजित आराखड्यात महिला पदाधिकाऱ्यासाठी प्रसाधनगृहासह विश्रांती कक्षाचे संकल्पन करण्यात येवून, सदर व्यवस्था इमारतीमध्ये निर्माण करण्यात यावी.
४) प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुवीजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:र्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

५) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करून, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

६) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

७) या कामी प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो संबंधित पंचायत समिती/जिल्हा परिषदेने सोसावा.

८) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

९) प्रत्यक्ष इमारतीचे बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग क्र.ईएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

०२. पंचायत समिती, नरखेड (जि. नागपूर) येथील नविन प्रशासकीय इमारतीकरिता पहिल्या मजल्याच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे.

| **General Abstract For Construction of P. S. Narkhed Dist. Nagpur First Floor Administrative Building** | | |
|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **Cost (In Rs.)** |
| **)A(** | **Essential Items** | |
| 1. | Building proper (Built up area Sq. m.) | |
| | First Floor Building | 22281219.00 |
| | **Sub Total (1)** | **22281219.00** |
| 2. | Electrifications | |
| | Internal 5 % of (a) | 2450934.00 |
| | External 6 % of (a) | |
| | **Sub Total 2** | **2450934.00** |
| | **Total Cost of (A) = (1) + (2)** | **24732153.00** |
| **(B)** | **Optional Items** | |
| (i) | Testing | 100990.00 |
| (ii) | Royalty | 73965.00 |
| | **Sub Total B** | **174955.00** |
| | **Total Project Cost (P) = (A)+(B)** | **24907108.00** |
| **(C)** | **Provisions** | |
| (i) | Contingencies 2 % on (a) | 498142.00 |
| (ii) | GST 12 % on (P) | 4483279.00 |
| (iii) | Insurance 1 % on (a) | 249071.00 |
| (iv) | Archetect Charges 2 % on (a) | 747213.00 |
| (v) | Price variation 10 % on (P) | 2490711.00 |
| | **Sub Total C** | **8468416.00** |
| **Total Cost Of Projct (TPC)= (A+B+C)** | | **33375524.00** |
| **Says in Lakh** | | **333.76** |

**०३.** उपरोक्त बांधकामांसाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरूपात, टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२९१२००५९२८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2025.04.29 12:12:23 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
२) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
३) मा. मंत्री (ग्रा. वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर विभाग, नागपूर.
६) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.
८) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.
९) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.
१०) कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, नागपूर.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नागपूर.
१२) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१३) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नागपूर विभाग, नागपूर.
१४) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नागपूर.
१५) सभापती, पंचायत समिती, नरखेड, जि. नागपूर.
१६) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, नरखेड, जि. नागपूर.
१७) निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.